**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील अधिकाऱ्यांच्या बदल्या/नियुक्त्या..**

**महाराष्ट्र शासन**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
**शासन आदेश, क्रमांक :** मविसे १०/१०२ (भाग-२)/२०११/आस्था-३,
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.**
**दिनांक :** ०२ जून, २०११

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व (५) मधील तरतूदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने ग्रामविकास व जलसंधारण विभागातील **श्री.एस.बी.हजारे, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना** यांच्या बदलीचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर त्यांची नियुक्ती **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद** या पदावर श्री.सी.जे.गुडेवार हे रजेवर गेल्यामुळे रिक्त झालेल्या पदावर करण्यात येत आहे.

२. **श्री.एस.बी.हजारे** यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्विकारावा. तसेच, त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.०८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सुचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. **श्री.एस.बी.हजारे** यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक तात्काळ शासनास कळवावा.

५. श्री.सी.जे.गुडेवार यांच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०११०६०२१५५४३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( र. ग. सय्यद )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
मा.सचिव (ग्रामविकास) यांचे स्वीय सहायक,
विभागीय आयुक्त (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
**संबंधित अधिकारी द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद/जालना यांचेमार्फत**
का.क्र.आस्था-२, ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
निवड नस्ती (का.क्र.आस्था-३), ग्रामविकास व जलसंधारण विभाग,